**युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत /देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या आणि अपंगत्व आलेल्या जवानांच्या बाबतीत आर्थिक मदत म्हणून देण्यात येणाऱ्या एकरकमी अनुदानात वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : मासैम-२०१६/प्र.क्र.९२(१)/२०१६/२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० नोव्हेंबर, २०१६.

वाचा :
१) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक : संकीर्ण-१०९६/३३३०/प्र.क्र.२२०/९६/२८, दि. ३०/३/१९९९.
२) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक :मासैम-१०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दि. १४/७/१९९९.
३) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक : मासैम-१०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दि. ४/१०/२०००.
४) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक :संकीर्ण-२००२/प्र.क्र.५०/२००२/२८, दि. १३/३/२००३.
५) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक :मासैक-२००२/९३३/प्र.क्र.८६/२००२/२८, दि. ९/१२/२००३.
६) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्रमांक :मासैम-२०१६/प्र.क्र.१३८/२०१६/२८, दि. ११/७/२०१६.
७) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६३६०/प्रस्ताव/सैकवि-१६/७९९, दि.२९/२/२०१६.

**प्रस्तावना :**

देशातील अंतर्गत सुरक्षा संबंधी मोहिमेत/चकमकीत दिनांक १ मे, १९९५ पासून धारातीर्थी पडलेल्या सैन्यातील महाराष्ट्रातील अधिकारी / जवानांच्या विधवांना, अवलंबितांना प्रत्येकी रुपये २ लाख प्रमाणे अर्थसहाय्य देण्याची योजना शासनाने दिनांक ३० मार्च, १९९९ च्या आदेशान्वये कार्यान्वित केली. त्याचप्रमाणे दिनांक ४ ऑक्टोबर, २००० च्या आदेशान्वये मे, १९९९ पासून जम्मू-काश्मिरमधील युध्दजन्य परिस्थिती प्रमाणेच देशातील सर्वच क्षेत्रात अंतर्गत सुरक्षा संबंधी मोहिमेत/चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सैन्यदलातील तसेच, सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्करी दलातील अधिकारी/जवानांच्या विधवांना /अवलंबितांना प्रत्येकी रुपये ५ लाख आणि

अपंगत्व आलेल्या अधिकारी/जवानांना त्यांचे अपंगत्वाचे प्रमाणानुसार आर्थिक मदत देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. धारातीर्थी पडलेल्या शहीद जवानांच्या कुटुंबियांस देण्यात येणाऱ्या आर्थिक मदतीची विभागणी त्याच्या कुटुंबातील सदस्यांमध्ये कशाप्रकारे करावी, याबाबतचे आदेश शासन निर्णय दिनांक ९ डिसेंबर, २००३ नुसार देण्यात आले आहेत. केंद्रिय संरक्षण मंत्रालयाच्या आदेशानुसार देशाबाहेरील मोहिमेवर गेलेले अधिकारी/जवान हेही या योजनेसाठी पात्र राहतील, असे दिनांक ११ जुलै, २०१६ च्या परिपत्रकान्वये स्पष्ट केले आहे.

२. वरील योजनेअंतर्गत देण्यात येणाऱ्या आर्थिक मदतीत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

३. युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या सैनिकांच्या वारसांना/अपंगत्व आलेल्या सैनिकांना/तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील सदस्य / त्यांच्या कुटुंबियांना आर्थिक मदत म्हणून देण्यात येणाऱ्या एकरकमी अनुदानात वाढ करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

अ) धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या बाबतीत सध्या रुपये ५ लाख आर्थिक मदत देण्यात येते, दिनांक १ एप्रिल, २०१६ पासून पुढील ५ वर्षात देण्यात येणारी आर्थिक मदत (एकरकमी अनुदान) खालीलप्रमाणे राहील.

| **ज्या घटनेमध्ये जवान धारातीर्थी पडला आहे, ती घटना ज्या वर्षात घडली आहे/घडेल, ते वर्ष** | **धारातीर्थी जवानाच्या कुटुंबियांस द्यावयाची एकूण आर्थिक मदत** |
|---|---|
| २०१६-१७ | रु. ८,००,००० (रुपये आठ लाख) |
| २०१७-१८ | रु. ८,५०,००० (रुपये आठ लाख पन्नास हजार) |
| २०१८-१९ | रु. ९,००,००० (रुपये नऊ लाख) |
| २०१९-२० | रु. ९,५०,००० (रुपये नऊ लाख पन्नास हजार) |
| २०२०-२१ | रु. १०,००,००० (रुपये दहा लाख) |

ब) अपंगत्व प्राप्त झालेल्या जवानास सध्या रुपये १ लाख (अपंगत्वाचे प्रमाण २० % ते ४९ % असल्यास) आणि रुपये ३ लाख (अपंगत्वाचे प्रमाण ५० % किंवा त्यापेक्षा जास्त असल्यास) इतकी आर्थिक मदत देण्यात येते. १ एप्रिल, २०१६ पासून पुढील ५ वर्षात देण्यात येणारी आर्थिक मदत (एकरकमी अनुदान) खालीलप्रमाणे राहील.

| **ज्या घटनेमध्ये जवानास अपंगत्व प्राप्त झाले, ती घटना ज्या वर्षात घडली आहे/घडेल, ते वर्ष** | **अपंगत्व प्राप्त झालेल्या जवानास द्यावयाची एकूण आर्थिक मदत** | |
|---|---|---|
| | **अपंगत्वाचे प्रमाण २० % ते ४९ % असल्यास** | **अपंगत्वाचे प्रमाण ५० % किंवा त्यापेक्षा जास्त असल्यास** |
| २०१६-१७ | रु. १,२५,०००/- | रु. ४,००,०००/- |
| २०१७-१८ | रु. १,५०,०००/- | रु. ४,५०,०००/- |
| २०१८-१९ | रु. १,७५,०००/- | रु. ५,००,०००/- |
| २०१९-२० | रु. २,००,०००/- | रु. ५,५०,०००/- |
| २०२०-२१ | रु. २,२५,०००/- | रु. ६,००,०००/- |

४. धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या बाबतीत देय असलेली आर्थिक मदत खालीलप्रमाणे विभागून देण्यात यावी.

| | **सध्या दिली जाणारी अनुदानाची रक्कम (शासन निर्णय, दि. ४ ऑक्टोबर, २००० नुसार)** | **उपरोक्त परिच्छेद ३ (अ) मध्ये नमूद केल्याप्रमाणे अनुज्ञेय अनुदानाची सुधारित रक्कम ( टक्केवारीनुसार)** |
|---|---|---|
| १) शहीद सैनिक विवाहीत असेल आणि त्याचे आई-वडीलही हयात असतील तर | | |
| (अ) त्याची वीरपत्नी | रु. ३ लक्ष | ६०% |
| (ब) त्याचे आई-वडील | | |
| १) वीरमातेला | रु. १ लक्ष | २०% |
| २) वीरपित्याला | रु. १ लक्ष | २०% |
| (क) त्यांचे आई-वडीलांपैकी आई किंवा वडील हयात असल्यास त्यांना | रु. २ लक्ष | ४०% |
| २) शहीद सैनिक विवाहीत असेल आणि त्याचे आई-वडील हयात नसतील तर त्याची वीरपत्नी | रु. ५ लक्ष | १००% |

| | | |
|---|---|---|
| ३) शहीद सैनिक अविवाहीत असेल आणि त्याचे आई-वडीलही हयात असतील तर | त्याचे आई-वडील यांच्यामध्ये समान विभागणी करुन | त्याचे आई-वडील यांच्यामध्ये समान विभागणी करुन |
| ४) शहीद सैनिक अविवाहीत असेल आणि त्याचे आई-वडीलही हयात नसतील तर | त्याचे भाऊ/बहीण यांच्यामध्ये समान विभागणी करुन | त्याचे भाऊ/बहीण यांच्यामध्ये समान विभागणी करुन |

५. या शासन निर्णयानुसार द्यावयाच्या आर्थिक मदतीपैकी २०% रक्कम शासकीय अनुदानातून व उर्वरित ८०% रक्कम मुख्यमंत्री सहायता (कारगील) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रुपये ४२.२१ कोटी इतक्या रकमेवरील व्याजातून देण्यात यावी.

६. लाभार्थ्यांना द्यावयाच्या आर्थिक मदतीपैकी २०% रक्कम शासकीय अनुदानातून देण्यासाठी लागणारा खर्च **"मागणी क्रमांक ए-५, प्रधानशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने - (००) (०४) देशांतर्गत सुरक्षा संबंधी मोहिमेत / चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना / अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५ २६०८)"** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ३६०/१६/व्यय-४, दिनांक ८ जुलै, २०१६ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११३०१७३०२२५१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d92842418782eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55d1, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2016.11.30 17:37:14 +05'30'

**(कि.म.जकाते)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.मंत्री (मा.सै.क.) यांचे खाजगी सचिव,
५. मा.राज्यमंत्री (मा.सै.क.) यांचे खाजगी सचिव,
६. सर्व मा.विधान सभा सदस्य व विधान परिषद सदस्य
७. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक,
८. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
९. प्रधान सचिव (मा.सै.क.) यांचे स्वीय सहायक,
१०.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
११.ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१२.कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई-४०० ००५.
१३.मुख्य माहिती आयुक्त व सर्व माहिती आयुक्त
१४.सर्व विभागीय आयुक्त,
१५.सर्व जिल्हाधिकारी,
१६.महालेखापाल (लेखा परीक्षा) - १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१७.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१८. अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र, मुंबई,
१९.निवासी लेखा परीक्षा अधिकारी,
२०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे-४११ ००६(५ प्रती),
२२. सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,
२३. सर्व मंत्रालयीन विभाग/मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख,
२४. सामान्य प्रशासन विभागाची सर्व कार्यासने,
२५. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२
२६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
२७. वित्त विभाग/व्यय-४, अर्थ-१३, मंत्रालय, मुंबई-३२
२८.निवडनस्ती /कार्या.२८ (२ प्रती).